# क्रिसमस ट्री जहाज



# ख्रिसमस ट्री जहाज

एल्जी, पर्ल आणि हेजल यांच्यासाठी वर्षातील सर्वात चांगले दिवस म्हणजे ख्रिसमसचे दिवस! याबद्दल कुणालाच शंका नाही. नोव्हेंबरच्या बर्फमय दिवसात स्प्रूसची झाड एकत्र करून ती "ख्रिसमस ट्री जहाजात" भरायला आपल्या वडिलांची मदत करतात. एका मोठ्या शहरात स्प्रूसची झाड घेऊन जाण्यासाठी वडिल मशिगनची नदी ओलांडून पलिकडे जातात.

एकदा "ख्रिसमस ट्री जहाज" नदीमधे हरवलं, ....मुली आपल्या वडिलांची वाट बघत राहिल्या. पण दुसरा नोव्हेंबर उजाडला तेव्हा एल्जी, पर्ल, हेजल आणि त्यांच्या आईच्या लक्षात आलं की त्यांनी काय केल पाहिजे.

सत्य घटनेवर आधारित ही सुंदर गोष्ट आपल्याला जीवनात संकल्प आणि साहस या गोष्टी किती महत्वाच्या आहेत हे शिकविते.





*"ख्रिसमस ट्री जहाज"* एका सत्य घटनेवर आधारित आहे. १८८७ च्या थंडीच्या दिवसात हरमन स्कुनयामैनने पहिल्यादाच मिनिस्तीक, मिशिगनवरून आणलेली स्प्रूसची झाड आपल्या राऊज सिम्मन जहाजावर लादली. मिशिगन नदीतून प्रवास करून बरोबर खृसमसच्या वेळी शिकागोमधे पोहोचला. नंतर दर वर्षी खृसमसमधे स्प्रूसची झाड त्या शहरांत आणू लागला. पण १९१२ सालच्या थंडीमधे त्याचे जहाज "राऊज सिम्मन्स" नदी प्रवाहात हरविले. या दु:खद घटनेनंतर कप्तान स्कुयनामैनची पत्नी व तीन मुलींनी त्याचा परिपाठ चालू ठेवला. आणि पुढची बावीस वर्ष स्प्रूसची झाड जहाजातून शिकागोमधे येत राहिली.



कुर्हाडीचे घाव झाडावर बसत होते.... झाड कापली जात होती. उत्तरेकडील कमी तापमान असलेल्या जंगलातील स्प्रूसची झाड कापली जात होती. दरवर्षी नोव्हेबरच्या शेवटाला कप्तान हरमन व त्याचे नाविक ख्रसमसच्या वेळी ही झाड शहरात घेऊन जाण्यासाठी कापत असत.



कप्तानाची पत्नी हेन्नाह, आणि तीन मुली हेजल, पर्ल आणि छोटी एल्जी दरवर्षी जंगलात जाऊन मदत करीत असत.




उन्हाळ्यामधे कप्तानाचे जहाज "मासे पकडणारे" जहाज व्हायचे. पण दर वर्षी थंडीमधे मात्र ते *"ख्रिसमस ट्री"* जहाज होत असे. कप्तान हरमन जहाजात स्प्रूसची झाड भरून ती मिशिगन नदीच्या पलिकडे शिकागोमधे घेऊन जात असे. तिथे त्याला सर्व लोक ओळखत  होते.



हेन्नाह आणि मुलींनी, कुडकुडत्या थंडीत एका सकाळी त्याला निरोप दिला. जाणार्या जहाजाकडे त्या पहात राहिल्या.



बर्फाळलेल्या नदीच्या प्रवाहातून जाणार्या *"ख्रसमस ट्री जहाजा"* बरोबर काही सीगल पक्षीही उडत होते.



रात्र झाली. बर्फ पडू लागला. पडणारे हिमकण पडणार्या तार्यासारखे दिसत होते. नदी प्रवाहातून रात्री प्रवास करायला कप्तानाला आवडत होत.




जहाज शिकागो नदीतून प्रवास करीत क्लार्क स्ट्रिट पूलाजवळ आले की नदीचे शांत वातावरण नगराच्या कोलाहालात बदलून जात असे.



जुने मित्र, आणि नवे ग्राहक कप्तानाला अभिवादन करीत व हेन्नाह व मुलींचे क्षेमकुशल विचारीत. शहरात कप्तान हरमनचे खूप मित्र होते.




पिता आणि मुलं, स्प्रूसचे झाड उचलून बर्फाने झाकून टाकलेल्या गल्ल्यामधून आपल्या घरी घेऊन जात असत.




प्रकाशाने उजळलेल्या घरातील खोल्या सर्वांना घरी परतून यायला सांगत होत्या.



खूप दूरून जंगलातून आणलेली स्प्रूसची झाड, नगरातल्या आरामदायी घरातून आकर्षकरित्या सजविली  गेली होती.



इथे कप्तानाच्या घरी, दर वर्षीप्रमाणे हेन्नाह, आणि हेजल, पर्ल, एल्जी नदीकडे पहात कप्तान परतण्याची वाट पहात होत्या.





पुढल्या वर्षी कप्तान शहरात घेऊन जाण्यासाठी झाड कापत होता तेव्हा खूप प्रमाणात बर्फ पडलं आणि पडतच राहिलं.

त्या वादळात झाडांनी भरलेलं जहाज घेऊन निघतांना कप्तानाने बायको, मुलीना आलिंगन देऊन त्यांचा निरोप घेतला.



खूप बर्फ वर्षाव झाला. नंतर नदीवर आणि जमिनीवर बर्फाचे वादळ सुरू झाले.



लवकरच *"ख्रसमस ट्री"* जहाज नदीवर चाललेल्या भयंकर बर्फाच्या वादळात सापडल आणि दिसेनासे झाले.



कप्तान आणि त्याच्या नाविकांनी वादळाशी लढण्याची पराकाष्ठा केली. पण वादळ इतक भयंकर होत की जहाजातील झाड उडून नदीत पडली. लहान रक्षक बोट जहाजापासून वेगळी झाली आणि नदीत कुठेतरी वाहून गेली.



जहाजावरील टिपण पुस्तकाचे एक पान कप्तानाने फाडले. व त्यावर आपल्या परिवारासाठी संदेश लिहीला. तो कागद एका बाटलीत घालून बाटली बंद केली आणि नदी प्रवाहात फेकून दिली.



वादळ थांबल्यावर कितीतरी आई,वडिल, मुल, मुली क्लार्क स्ट्रिट पुलावर "*ख्रसमस ट्री*" जहाजाची वाट पहात होते.



वर्तमानपत्रात बातमी आली की कप्तान हरवला आहे. सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत कितीतरी जहाजांनी बर्फाच्छादित नदीच्या पाण्यात कप्तानाचा शोध घेतला.





दोन मासेमार्यांना त्यांच्या जाळ्यांत अडकलेली स्प्रूसची झाड मिळाली. पण *"ख्रसमस ट्री जहाज"* शहरांत कधीच  पोहोचले नाही.

काही दिवसानंतर विस्कान्सिनच्या किनार्यावर एक बाटली मिळाली. बाटलीमधे कप्टन हरमनचा संदेश होता. त्यामधे लिहीले होते, *"माझी प्रिय हेन्नाह, व माझ्या प्रिय मुलींनो, भयंकर वादळ सुरू आहे. आम्ही प्रयत्न करीत आहोत. मी तुमच्यावर खूप प्रेम करतो.....*हरमन"



हेन्नाहने आपला पती परत येईल म्हणून खूप वाट पाहिली. पण तो परत आलाच नाही.  पती गमावून बसल्यामुळे हेन्नाह खूप दु:खी झाली.
हेजल, पर्ल व एल्जीला आपल्या वडिलांची खूप आठवण येत होती.



पण नोव्हेबरमधे बर्फवृष्टीला सुरवात झाली तेव्हा हेन्नाह मनामधे समजून चुकली कि तिने काय केले पाहिजे.



तिने काही नाविकांना कामाला लावले व जंगलातून स्प्रूसची झाड कापून घेतली. हेजल, पर्ल,
व एल्जीने वडिलांचे काम चालू ठेवायला आईची मदत केली.



एका नविन जहाजावर ती झाड भरली. हेन्नाह, मुली आणि काही बायका जहाजावर चढल्या नाविकाने जहाज नदीतून प्रवास करून शिकागोला आणले. पूर्ण प्रवासांत बायका फुलांचे हार बनवित होत्या व भजन म्हणत होत्या.





क्लार्क स्ट्रिट पूलाजवळ उभ्या असणार्या कप्तानाच्या पूर्वीच्या ग्राहकांनी जहाज दूर असतांनाच पाहिले होते. जहाज झाडांनी भरलेले होते. त्यावर जळणार्या मेणबत्त्या चमकत होत्या. सगळ्याना लगेचच कळलं की "ख्रसमस ट्री जहाज" येत आहे.

जसा नविन जहाजाने नदीमधे प्रवेश केला, हेन्नाह आणि मुलींचे स्वागत करण्यासाठा सारे लोक एकत्र आले. म्हातारे, तरूण सर्व मिळून गाणी म्हणू लागले. पूर्ण शहर ख्रसमसच्या प्रकाशमय आणि संगितामय वातावरणामधे रंगून गेला.



नंतर खूप वर्षांपर्यंत, *"ख्रसमस ट्री जहाज"* स्प्रूसची झाडे घेऊन , बरोबर ख्रसमसच्या वेळी नदीवरून शहराकडे येत राहिले.

समाप्त